

# महाराष्ट्र शासन

**क्रमांक: गौखनि-२७ अ/०८२१/प्र.क्र.७०/ख-१**

महसूल व वन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :-** ०१ एप्रिल,२०२२

विषय : <u>गौण खनिज- पालघर</u>

सातपाटी खाडीलगत मौजे कुंभवली येथील महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डच्या मालकीच्या जेट्टीपर्यंत सातपाटी खाडीतील नौकानयन मार्ग सुकर करण्याकरीता गौण खनिज उत्खनन करण्याकरीता शासनजमा करण्यात आलेली स्वामीत्वधनाची रक्कम परत करणेबाबत.

**महालक्ष्मी औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था, पालघर**

**<u>शासन ज्ञापन</u>:-**

जिल्हाधिकारी, पालघर यांना त्यांचे पत्र क्र.रेतीगट/गौ.ख./टे-१/कावि-३२२/२०२१, दि.१८/८/२०२१ रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून मला असे कळविण्याचे निदेश आहेत की, सातपाटी खाडीलगत मौजे कुंभवली येथील महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डच्या मालकीच्या जेट्टीपर्यंत सातपाटी खाडीतील नौकानयन मार्ग सुकर करण्याकरीता मे.अरोवाना पोर्टस ॲन्ड इन्फ्रास्ट्रक्चर प्रा.लि. तर्फे महालक्ष्मी औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था यांनी २००० ब्रास गाळ उपसणीकरीता स्वामीत्वधनाची रक्कम रु.२९,४४,०००/- शासनजमा केली. तथापि, दरम्यानच्या काळात सातपाटी खाडीमध्ये स्थानिक संस्था, रहिवासी, स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी खाडीतून यांत्रिकी साधनांच्या सहाय्याने होणाऱ्या उत्खननास विरोध दर्शविल्याने महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांचेकडून उत्खनन करण्यात येणाऱ्या गटाचा मे.अरोवाना पोर्टस ॲन्ड इन्फ्रास्ट्रक्चर प्रा.लि. तर्फे महालक्ष्मी औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था, पालघर यांना ताबा देण्यात आलेला नाही. तसेच जिल्हाधिकारी कार्यालयाकडून गौणखणिज परवाना देण्यात आलेला नाही. त्यामुळे महालक्ष्मी औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था, पालघर यांना त्यांनी शासनजमा केलेली स्वामीत्वधनाची रक्कम रु.२९,४४,०००/- परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०२. सबब, महालक्ष्मी औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था, पालघर यांनी स्वामीत्वधनाची रु.२९,४४,०००/- (रुपये एकोणतीस लाख चव्वेचाळीस हजार फक्त) इतकी रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०३. याबाबीवर होणारा खर्च सन २०२२-२०२३ यावर्षाकरीता लेखाशिर्ष, “०८५३- अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)” खाली उपलब्ध असलेल्या अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०४.** सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०४०११५०७२८२४१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI
CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2022.04.01 15:10:47 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, पालघर

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, सी.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर
५) वित्त विभाग, (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
७) निवडनस्ती “ख-१” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.